जुलै-ऑक्टोबर २०१९ मधील अतिवृष्टी व पूर बाधित व्यक्तींना मदत देण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०१९/प्र.क्र.१७७/म-३**
**हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२**
**तारीख:- ०६ डिसेंबर, २०१९**

**संदर्भ:** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१९/ प्र.क्र.१६५/ म-३, दिनांक २९/०८/२०१९ व दिनांक ११/०९/२०१९
२) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. उपआ/नैआ/ कली/कावि३२०/ दिनाक ०४/११/२०१९
३) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. मह-३/नैआ/कावि/१०५०/२०१९ दिनाक १४/११/२०१९
४) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.मशा/कार्या-६/नै.आ./कावि-३७५८५/२०१९, दिनांक १९/११/२०१९ आणि दिनांक ०४/१२/२०१९

**प्रस्तावना :**

राज्यातील विविध जिल्ह्यातील शहरी व ग्रामीण भागामध्ये दि. २६ जुलै व त्यानंतर झालेल्या अतिवृष्टीमुळे पुराचे पाणी शहरी व ग्रामीण भागामध्ये पसरले. या पूर परिस्थिमुळे बाधीत झालेल्या कुटुंबियांना मदत देण्याबाबत मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील मंत्रीमंडळ उपसमितीने दिनांक १९/०८/२०१९ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार मदतीचे दर व निकष शासन निर्णय क्र. सीएलएस-२०१९/प्र. क्र.१६५/म-३, दिनांक २९/०८/२०१९ अन्वये निश्चित करण्यात आले आहेत.

२. दिनांक २९/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील अनुक्रमांक ३ नुसार " पूर्णत: नष्ट झालेली पक्की व कच्ची घरे, पडझड झालेली पक्की व कच्ची घरे, मोठ्या प्रमाणावर पडझड झालेली पक्की व कच्ची घरे, पक्की घरे जिथे किमान १५ टक्के पडझड झाली आहे व घर मालक सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातुन अशी घरे पूर्णत: पाडणार आहेत अशा पात्र कुटुंबांना ग्रामिण व शहरी भागानुसार लागु असलेली पंतप्रधान आवास योजना, शबरी, रमाई आणि आदिम इत्यादी घरकुल योजनेखाली लाभ देण्यात येईल. या योजनेअंतर्गत अनुज्ञेय असलेल्या रक्कमे व्यतिरिक्त दिनांक १३/०५/२०१५ च्या शासन निर्णयानुसार राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF)/ राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधी (NDRF) अंतर्गत अनुज्ञेय असलेली रक्कम असे दोन्ही मिळून घर बांधणीसाठी मदत देण्यास मान्यता देण्यात आली आहे". त्यानुसार विभागीय आयुक्त, अमरावती, पुणे आणि कोंकण यांनी अनुक्रमे रूपये ३,६७,४१,०००/- (अक्षरी रूपये तीन कोटी सदुसष्ट लाख ऐकेचाळीस हजार फक्त), रूपये २२०,३६,२९,६००/- (अक्षरी रूपये दोनशे वीस कोटी छत्तीस लाख एकोणतीस हजार सहाशे फक्त), आणि रू. ३,७०,१६,०००/- (अक्षरी रूपये तीन कोटी सत्तर लाख सोळा हजार फक्त) अशा प्रकारे एकूण रूपये २२७,७३,८६,६००/- (दोनशे सत्तावीस कोटी त्र्याहत्तर लाख शहाऐंशी हजार सहाशे फक्त) इतका निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

दिनांक २९/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील अनुक्रमांक ३ नुसार पूर्णत: नष्ट झालेली पक्की व कच्ची घरे, पडझड झालेली पक्की व कच्ची घरे, मोठ्या प्रमाणावर पडझड झालेली पक्की व कच्ची घरे, पक्की घरे जिथे किमान १५ टक्के पडझड झाली आहे व घर मालक सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातुन अशी घरे पूर्णत: पाडणार आहेत अशा पात्र कुटुंबांना ग्रामिण व शहरी भागानुसार लागु असलेली पंतप्रधान आवास योजना, शबरी, रमाई आणि आदिम इत्यादी घरकुल योजनेखाली लाभ देण्यात येईल. या योजनेअंतर्गत अनुज्ञेय असलेल्या रक्कमे व्यतिरिक्त दिनांक १३/०५/२०१५ च्या शासन निर्णयानुसार राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF)/ राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद निधी (NDRF) अंतर्गत घर पडझडीसाठीची अनुज्ञेय असलेली मदत देण्यास प्राप्त झालेल्या शासन मान्यतेनुसार, विभागीय आयुक्त, अमरावती , पुणे आणि कोंकण यांना अनुक्रमे रूपये ३,६७,४१०००/- (अक्षरी रूपये तीन कोटी सदुसष्ट लाख ऐकेचाळीस हजार फक्त), रूपये २२०,३६,२९,६००/- (अक्षरी रूपये दोनशे वीस कोटी छत्तीस लाख एकोणतीस हजार सहाशे फक्त), आणि रू. ३,७०,१६,०००/- (अक्षरी रूपये तीन कोटी सत्तर लाख सोळा हजार फक्त) अशा प्रकारे एकूण रूपये २२७,७३,८६,६००/- (दोनशे सत्तावीस कोटी त्र्याहत्तर लाख शहाऐंशी हजार सहाशे फक्त) इतका निधी खालील तक्त्यानुसार वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **महसुली विभाग** | **जिल्हा** | **निधी (रूपयात)** |
|---|---|---|---|
| १ | अमरावती | अमरावती | ३,६५,६७,००० |
| २ | | वाशिम | १,७४,००० |
| **अ** | **अमरावती विभाग एकूण** | | **३,६७,४१,०००** |
| ३ | पुणे | पुणे | १,१२,८७,५०० |
| ४ | | सातारा | ५,५४,३१,००० |
| ५ | | सांगली | १०२, ५१,७८,९०० |
| ६ | | सोलापूर | ३१,६२,००० |
| ७ | | कोल्हापूर | ११०,८५,७०,२०० |
| **ब** | **पुणे विभाग एकूण** | | **२२०,३६,२९,६००** |
| ८ | कोंकण | ठाणे | २६,६९,००० |
| ९ | | पालघर | १,२८,९९,००० |
| १० | | रायगड | १,०२,९३,००० |
| ११ | | रत्नागिरी | ५०,७७,००० |
| १२ | | सिंधुदुर्ग | ६०,७८,००० |
| **क** | **कोंकण विभाग एकूण** | | **३,७०,१६,०००** |
| | एकूण अ+ब+क | | **२२७,७३,८६,६००** |

२. वरील प्रयोजनासाठी प्रचलित दरानुसार होणारा खर्च प्रधान लेखाशीर्ष “२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ०२ पुर चक्रीवादळ इत्यादी, ११३ घरांची दुरूस्ती/पुनर्बांधणी यासाठी सहाय्य, (९१) (०१) घरांची दुरूस्ती/पुनर्बांधणी यासाठी सहाय्य, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ ०२७१)” या लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा.

३. परिच्छेद क्र. १ मधील तक्त्यामध्ये दर्शविल्यानुसार निधी जिल्ह्यांना विभागीय आयुक्तांमार्फत उपलब्ध करुन देण्यात येत आहे. कक्ष अधिकारी (म-११) यांनी सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करावा.

४. उपरोक्त दराने देण्यात येणारी मदत ही केवळ याच घटनांसाठी मर्यादित राहील. ही बाब अन्य प्रकरणी पुर्वोदाहरण म्हणून समजण्यात येऊ नये. तसेच प्रस्तुत निधी वितरीत करतांना दि.२९/८/२०१९ व दि. ११/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात यावी.

५. सदर निधी प्राप्त झाल्याबरोबर अतिवृष्टी व पूरग्रस्त बाधितांना मदतीची रक्कम बँक खात्यामार्फत तात्काळ वितरीत करण्यात यावा. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची विभागीय आयुक्त यांनी खातरजमा करावी. निधी वाटपाचे लेखे, अभिलेखे, नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत होणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात याव्यात. झालेल्या खर्चाचा कोषागार कार्यालय व महालेखापाल कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी दर तीन महिन्यांनी ताळमेळ घेवून त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या विभागाकडे तात्काळ सादर करण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. वितरीत अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०६१३०७५४५५१९ आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2019.12.06 13:10:14 +05'30'

**( सु.ह.उमराणीकर)**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
४. अपर मुख्य सचिव ( वित्त),मंत्रालय,मुंबई,
५. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग/पुणे विभाग/कोंकण विभाग
६. जिल्हाधिकारी, अमरावती/अकोला/यवतमाळ/बुलढाणा/वाशिम, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
९. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/अकोला/यवतमाळ/बुलढाणा/वाशिम, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.
११. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१२. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१३. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१४. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )